**सन २००९-२०१० या वित्तीय वर्षाकरीता वन महसूल अनुदान "माहे डिसेंबर २००९ ते मार्च २०१० या चार महिन्याकरीता अंतिम हप्ता."**

**३६०४ स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे. मागणी क्रमांक-एल-५(०१)(१०) महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १८१ (अ) अन्वये जिल्हा परिषदाना देय असलेले ७ टक्के वन महसूल अनुदान (योजनेतर) (३६०४०५०३).**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एफआरजी -२००९/प्र.क्र. ५०२६ /वित्त-३( २४)**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक - ११ मार्च, २०१०.**

**वाचा:-** १) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक- एफआरजी-१०९३/ प्र.क्र.२४२६/वित्त-३ (२४), दिनांक १२ नोव्हेंबर, १९९३.
२) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक-एफआरजी-२००९/ प्र.क्र. **५०२६**/वित्त-३ (२४), दिनांक : **१३ मे,** २००९.
३) शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक-एफआरजी-२००९/ प्र.क्र. **५०२६**/वित्त-३ (२४), दिनांक : **२ जुलै, २००९.**
**४)** शासन निर्णय,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक-एफआरजी-२००९/ प्र.क्र. **५०२६**/वित्त-३ (२४), दिनांक : **५ नोव्हेंबर, २००९.**

शासन निर्णय

महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम १९६१ मधील कलम १८१(अ) अन्वये जिल्हा परिषदांना देय असलेले ७ टक्के वन महसूल अनुदान मंजूर करता यावे म्हणून सन २००९-२०१० या वित्तीय वर्षासाठी एकूण रुपये ४,७३,६४,०००/- (रुपये चार कोटी, त्र्याहत्तर लक्ष, चौसष्ट हजार फक्त ) एवढी तरतूद मंजूर करण्यात आली आहे. सदर तरतुदीपैकी संदर्भाधीन क्रमांक २ व ३ च्या शासन निर्णयान्वये एकूण रुपये १,५७,८७,०००/- (रुपये एक कोटी, सत्तावन्न लक्ष, सत्याऐंशी हजार फक्त) एवढी रक्कम माहे एप्रिल ०९ व मे ०९ आणि जुन ०९ व जुलै, २००९ करीता देण्यात आलेल्या पहिल्या व दुस-या हप्त्यापोटी प्रधान मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र राज्य नागपूर यांच्याकडे सर्व जिल्हा परिषदांना वितरीत करण्यासाठी

सुपूर्द करण्यात आली आहे. त्याच प्रमाणे माहे ऑगस्ट ०९ ते नोव्हेंबर ०९ या चार महिन्याकरीता रुपये १,५७,९२,०००/- (रुपये एक कोटी, सत्तावन्न लक्ष, ब्याण्णव हजार फक्त) इतकी ७% वन महसूल अनुदानाची रक्कम तिसरा हप्ता म्हणून शासन निर्णय समक्रमांक दिनांक ५/११/२०१० अन्वये मंजूर करण्यांत आली आहे. अशाप्रकारे आता पर्यंत एकूण रुपये ४,७३,६४,०००/- मंजूर तरतूदीपैकी रु. ३,१५,७९,०००/-इतकी अनुदानाची रक्कम प्रधान मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र राज्य नागपूर यांच्या मार्फत सर्व सबंधीत जिल्हा परिषदांना वितरीत करण्यासाठी मंजूर करण्यात आली आहे.

२. आता या शासन निर्णयान्वये माहे डिसेंबर ०९ ते मार्च १० या चार महिन्यासाठी चौथा हप्त्याकरीता रुपये १,५७,८५,०००/-(रुपये एक कोटी, सत्तावन्न लक्ष, पंच्याऐंशी हजार फक्त ) एवढी रक्कम सर्व जिल्हा परिषदांना वितरीत करण्यासाठी प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपुर्द करण्यात येत आहे. अशा प्रकारे सन २००९-१० या वित्तीय वर्षातील मंजूर तरतूदीच्या संपूर्ण रु. ४,७३,६४,०००/- एवढया रकमा मंजूर करण्यांत आल्या असून, त्या वितरीत करण्यासाठी प्रधान मुख्य, वन संरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपुर्द करण्यांत आल्या आहे.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेली अनुदानाची रक्कम प्रधान मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र राज्य नागपूर यांनी सर्व सबंधित जिल्हा परिषदांमध्ये वाटप करावयाची असून, वितरण आदेशाच्या प्रती शासनाकडे पाठवावयाच्या आहेत. जिल्हा परिषदांनी शासन मंजूरी देईल या अपेक्षेने मंजूर केलेल्या रकमेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. जिल्हा परिषदांनी हे अनुदान संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयानुसार जंगल क्षेत्रामधील आदिवासींच्या विकासाकरीता आवश्यक वाटतील अशा योजनांवर व जंगल क्षेत्राच्या विकासासाठी असणा-या योजनांवर खर्च करावे आणि उपयोगिता प्रमाणपत्र प्रधान मुख्य वनसंरक्षक महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडे पाठवावे. प्रधान मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र राज्य नागपूर यांनी, जिल्हा परिषदांना दिलेल्या वन महसूल अनुदानाच्या खर्चाच्या व जमेच्या रकमांचा ताळमेळ या विभागाच्या परिपत्रक क्र.आरसीएन १०८९/सीआर ३०/२७/२८, दिनांक ५ सप्टेंबर ९० अन्वये विहित केलेल्या कार्यप्रणाली प्रमाणे घालावा व त्याप्रमाणे आपली माहिती या विभागाकडे पाठवावी.

५. या बाबीवर होणारा खर्च मागणी क्र.एल-५" ३६०४ स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे २००- इतर संकीर्ण व नुकसान भरपाईच्या अभिहस्तांकित रकमा देणे दत्तमत(०१)(१०) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १८१(अ) अन्वये जिल्हा परिषदांना वन महसूल अनुदाने (योजनेतर) लेखाशीर्ष क्रमांक (३६०४०५०३ )" या अर्थसंकल्पीय शीर्षाखाली दाखवावा व सन २००९-२०१० साठी अधिनस्त ठेवलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा. हा शासन निर्णय मिळाल्याची कृपया पोच द्यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक <u>२०१००३१११७०७४४००१</u> असा आहे.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक : अंदाज-१०.०९/ सीआर--/२००९/ अर्थसंकल्प-३, दिनांक २३ मार्च, २००९ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( सुरेखा र. सूर्यवंशी )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) प्रधान मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) सर्व विभागीय आयुक्त.
३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
४) अध्यक्ष, जिल्हा परिषदा. (सर्व )
५) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
६) मुख्य वन संरक्षक अमरावती, ठाणे, नाशिक, पुणे, दक्षिणचंद्रपूर, उत्तरचंद्रपूर, धुळे, यवतमाळ, औरंगाबाद, कोल्हापूर, नागपूर.
७ उप वन संरक्षक अधिकारी,अमरावती / अकोला / बुलढाणा / यवतमाळ / नागपूर / वर्धा /भंडारा / गोंदिया / नांदेड / औरंगाबाद / जालना / परभणी / हिंगोली / सोलापूर / सावंतवाडी/ पुणे / कोल्हापूर / सातारा / ठाणे / पश्चिम-नाशिक / उत्तर-धुळे / जळगांव /रायगड (अलिबाग) /मध्ये चांदा वन विभाग,चंद्रपूर / सिरोंचा (इटटापल्ली) अहमदनगर यांना विनंती करण्यात येते की, प्रधान मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र राज्य नागपूर यांनी त्यांच्याकडे जिल्हा परिषदांना वाटपासाठी ७ % वन महसूल अनुदान सपूर्द केल्यानंतर त्वरित सदर अनुदान संबंधित जिल्हा परिषदांना मंजूर करावे.
८) उप विभागीय वन अधिकारी बीड, उस्मानाबाद, रत्नागिरी, सांगली.
९) महालेखापाल महाराष्ट्र -१ मुंबई. ( लेखा परिक्षण )
१०) महालेखापाल महाराष्ट्र -२ नागपूर. ( लेखा परिक्षण )
११) महालेखापाल महाराष्ट्र -१ मुंबई. (लेखा व अनुज्ञेयता)
१२) महालेखापाल महाराष्ट्र -२ नागपूर. (लेखा व अनुज्ञेयता)
१३) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई,
१४) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, पुणे, औरंगाबाद, नागपूर, अमरावती ,कोकण भवन (बेलापूर) व नाशिक.
१५) महसूल व वन विभाग फ-९ मंत्रालय, मुंबई.
१६) वित्त विभाग.व्यय-१५, अर्थ-१६, मंत्रालय, मुंबई -३२.
१७) कार्यासन क्रमांक -वित्त-१, वित्त-७ , वित्त-८ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
१८) निवड नस्ती , का.क्र. वित्त-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
१९) संगणक कक्ष, ग्राम विकास व जलसंधारण विभाग. मंत्रालय, मुंबई -३२.